जिल्हे व तहसील येथील कार्यालयांतील चतुर्थश्रेणी कर्मचा-यांना अतिकालिक भत्ता देण्याबाबत सुधारित वेळा.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक जीसीएस-१३८२/सीआर-१२६६/एसईआर-९,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १० जानेवारी १९८३.

पहा :- शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक जीसीएस-१३८२/सीआर-३२४/एसईआर-९, दिनांक २० जुलै १९८२.

निर्णय :- जिल्हे व तहसील येथील कार्यालयांतील चतुर्थश्रेणी कर्मचा-यांना कार्यालयीन वेळेनंतर कार्यालयीन कामासाठी थांबावे लागल्यास, मिळणा-या अतिकालिक भत्त्याचे दर व वेळा वर दर्शविलेल्या शासन निर्णयान्वये ठरविण्यात आले आहेत. उपरोक्त वेळांनुसार, जिल्हे व तहसील येथील चतुर्थश्रेणी कर्मचा-यांना त्यांच्या कार्यालयीन वेळेनंतर २ तासांनी अतिकालिक भत्ता देय होतो. तो अवधी कमी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. शासनाने आता असे ठरविले आहे की, जिल्हे व तहसील येथील शासकीय कार्यालयांतील चतुर्थश्रेणी कर्मचा-यांना संध्याकाळी कार्यालयीन वेळेनंतर कार्यालयीन कामासाठी थांबावे लागल्यास, त्यांस ७-३० ते ९-३० पर्यंत रु. ३.५० व ९-३० नंतर रु. ४.५० या दराने अतिकालिक भत्ता देण्यात यावा.

२. सुधारित वेळा, दिनांक १ जानेवारी १९८३ पासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. कृ. गोलतकर,
शासनाचे सहाय्यक सचिव.

प्रति
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांची कार्यालये, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई (१६० प्रती),
महालेखापाल, महाराष्ट्र २, नागपूर (४० प्रती),
महालेखापाल, (वैज्ञानिक व वाणिज्य), मुंबई (४० प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

कृ. मा. प.

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
मंत्री, राज्यमंत्री व उपमंत्री यांचे खाजगी सचिव,
राज्यपालांचे सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

---

*पत्राने.